सन २०१९ मधील ३३ कोटी वृक्षारोपण कार्यक्रमांतर्गत “वृक्षलागवड व संगोपन” या साठी निधी वितरित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक :- पुरक-२०१९/प्र.क्र.६७/उद्योग-६.**

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक :- २९ नोव्हेंबर, २०१९

वाचा: -१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक -साववि-२०१६/प्र.क्र.८०(भाग-२)/फ-११, दि. २५ जुलै, २०१८.

२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक -साववि-२०१८/प्र.क्र.१४४/फ-११, दि. ६.९. २०१८.

३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८ जुलै,२०१९

४) उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.पूरक-२०१९/(प्र.क्र.६४)/प्रशासन-१, दि.१८ सप्टेंबर,२०१९.

५) विकास आयुक्त (उद्योग),उद्योग संचालनालय यांचे क्र.उसं/वृक्ष लागवड व संगोपन निधी / २०१९ / अे-१४८३,दि.२१ नोव्हेंबर,२०१९ चे पत्र.

**प्रस्तावना:-**

हरित महाराष्ट्र संकल्पनेंतर्गत सन २०१९ मध्ये दि.०१ जुलै,२०१९ ते ३० सप्टेंबर,२०१९ या कालावधीत “३३ कोटी वृक्षरोपण कार्यक्रमाची आणि संगोपन“” या कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यासाठी नवीन लेखाशिर्ष उघडून त्याअंतर्गत एकंदर अर्थसंकल्पीय तरतूदींपैकी कार्यक्रमावरील खर्चातून ०.५ % मर्यादेत तरतूद उपलब्ध करून घेण्यास महसूल व वन विभागाने संदर्भाधिन दि.२५.७.२०१८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे.

महसूल व वन विभागाच्या संदर्भ क्र.२ येथील दि.६.९.२०१८ च्या शासन निर्णयान्वये सन २०१९ च्या पावसाळयात करावयाच्या नियोजित ३३ कोटी वृक्ष लागवडीचे विभाग निहाय, जिल्हा निहाय व यंत्रणा निहाय उद्दीष्टांचे वाटप करण्यात आलेले आहे. त्यानुसार उद्योग प्रभागास एकूण १५४५३०० वृक्षारोपणाचे उद्दीष्ट निश्चित करण्यात आलेले आहे. सदर वृक्षारोपणाचे उद्दीष्ट साध्य करण्याच्या दृष्टीने “वृक्ष लागवड व संगोपन” यासाठी निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०१९-२० मधील अर्थसंकल्पात वृक्ष लागवडीकरीता संदर्भाधिन दि.१८ सप्टेंबर,२०१९ च्या शासन निर्णयानुसार “मागणी क्र.के-३,२४०६ - वनीकरण व वन्य जीवन, ०४ - वनीकरण व पर्यावरण विकास, १०१-राष्ट्रीय वनीकरण व पर्यावरण विकास कार्यक्रम, (००)(००)(०१)-शाश्वत विकास ध्येय (२४०६ ए ४७२)(उद्योग) (कार्यक्रम) ” या लेखाशिर्षाखाली एकूण ६० .०० लक्ष इतकी तरतूद मंजूर करण्यात आलेली असून वित्त विभागाने यापैकी ६० % च्या मर्यादेत रूपये ३६.०० लाख इतका निधी वितरणासाठी उपलब्ध करून दिला आहे.

उद्योग विभागांतर्गत विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय,मुंबई यांना वृक्षारोपणासाठी त्यांच्या संदर्भ क्र.५ येथील दि.२१.११.२०१९ रोजीच्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार उक्त रूपये ३६.०० लाख इतका (मजूरीसाठी रू. ९,०२,०००/- ) (पुरवठा व सामुग्रीसाठी - रु.२६,९८,०००/-)निधी या शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

१) विकास आयुक्त, उद्योग संचालनालय यांच्या कार्यालयाचे क्षेत्रिय कार्यालयनिहाय उद्दिष्ट वाटप व निधी वितरण विवरणपत्र खालील प्रमाणे आहे.

| कार्यालयाचे नाव | उद्दिष्ट (वृक्ष लागवड) | कार्यालयास वितरित करण्यात येणारी रक्कम रूपये ३६,०० लाख (६० % च्या मर्यादेत) | |
|---|---|---|---|
| | | मजूरीसाठी (रूपये) | पुरवठा व सामग्रीसाठी (रूपये) |
| उद्योग सह संचालक (ठाणे) | १,५१,०५० | ४५,०००/- | १,३४,०००/- |
| उद्योग सह संचालक (मु.प्रा.वि) | २०० | ५,०००/- | ८,०००/- |
| उद्योग सह संचालक (पूणे) | ३,४०,००० | २,६४,०००/- | ७,९२,०००/- |
| उद्योग सह संचालक (नाशिक) | ९९,२५० | ९५,०००/- | २,८६,०००/- |
| उद्योग सह संचालक (नागपूर) | २,४९,८५० | २,११,०००/- | ६,३२,०००/- |
| उद्योग सह संचालक (अमरावती) | ३,७५,८५० | २,१२,०००/- | ६,३५,०००/- |
| उद्योग सह संचालक (औरंगाबाद) | १,९४,९०० | ३१,०००/- | ९४,०००/- |
| अधिक्षकीय उद्योग अधिकारी, उपविभागीय कार्यालय (नांदेड) | १,४७,५०० | ३९,०००/- | १,१७,०००/- |
| एकूण | | ९,०२,०००/- | २६,९८०००/- |

सदर रकमेच्या आहरण व संवितरणाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय , मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात येत आहेत. या बाबींवरील खर्च करताना प्रचलित नियम व तरतूदींची पुर्तता होईल याची कटाक्षने दक्षता घेण्यात यावी. खर्च मेळ व इतर वित्तीय बाबींच्या समन्वयाची जबाबदारी पार पाडण्याच्या दृष्टीने आवश्यक उपाययोजना करण्यात याव्यात. वितरित निधी अन्य कोणत्याही बाबीसाठी उपलब्ध करून देता येणार नाही. उपलब्ध करून देण्यात आलेल्या तरतूदीमधून झालेल्या खर्चाचे विवरणपत्र तसेच उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करण्यात यावे.

हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८.७.२०१९ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत असून या परिपत्रकातील अटी व शर्तीचे काटेकोर पालन करण्याची दक्षता घ्यावी.

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौ.सं. क्र.३९७/१४६१, दि.२.८.२०१९ व वित्त विभागाच्या अनौ.सं. क्र.१६७/२०१९/व्यय-१६, दि.१६.८.२०१९ अन्वये त्यांच्या प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१९११२९१६५५३१३२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kavita Vijay Pawar

Digitally signed by Kavita Vijay Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries, Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a3b87786359abd7b3f135e9849f2f0e3f2ca97e8ca2dd67ad836635a3aa0ea9, serialNumber=6f8674619c7f615d9eeac52c9289956e27601f17938f0e253b14bde8e35e822e, cn=Kavita Vijay Pawar
Date: 2019.11.29 17:01:10 +05'30'

**( कविता पवार )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति:- माहितीसाठी व आवश्यक त्या उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित

१. प्रधान सचिव (उद्योग), यांचे स्वीय सहायक, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई
३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), व (लेखापरिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई.
४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), व (लेखापरिक्षा), महाराष्ट्र -२, नागपूर.
५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई( २ प्रती).
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७. लेखा अधिकारी, उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन,मुंबई-३२ (५ प्रती)
८. सहसंचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई .
९. कक्ष अधिकारी, प्रशासन - १, उद्योग , उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई -३२.
१०. निवडनस्ती (उद्योग-६).